एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ (CPTP-३) मधील परिविक्षाधीन उप अधीक्षक भूमि अभिलेख गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना तात्पुरती स्वरुपाची नियुक्ती देण्याबाबत........

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : परीक्षा-२०१६/प्र.क्र.७०/ई-६,**
मुख्य इमारत, १ ला मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ११ सप्टेंबर, २०१८

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का-१२, दि.२८.०४.२०१५
२) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र.टीआरएन-०५१८/प्र.क्र.३२/सीपीटीपी-ब, दि.२३.०५.२०१८
३) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख यांचे पत्र क्र.आस्था/प्र.क्र.४८१/२०१८/आ-१, दि.३१.०७.२०१८

**शासन निर्णय :-**

भूमी अभिलेख विभागातील उप अधीक्षक भूमी अभिलेख ( गट-ब ) संवर्गाकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात आलेल्या राज्य सेवा परीक्षा-२०१५ द्वारे निवड होऊन वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थामध्ये दाखल झालेल्या परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांचे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ अंतर्गत प्रशिक्षण पुर्ण झाले असून, वाचा क्र. ०२ येथील पत्रान्वये सदर परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांची जेष्ठता सूची तयार करुन सामान्य प्रशासन विभागाने या विभागास उपलब्ध करुन दिली आहे. यास्तव सदर अधिकाऱ्यांना पदस्थापना देण्यासाठी वाचा क्र.०१ येथील शासन अधिसूचनेन्वये प्रसिद्ध केलेल्या महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५ मधील तरतूदींनुसार विभागीय संवर्ग वाटप करुन, नागरी सेवा मंडळ (१) ने केलेल्या शिफारशी व शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरून खालील विवरणपत्रातील स्तंभ क्र.०२ मधील परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना स्तंभ क्र. ३ मध्ये नमूद महसूली विभाग वाटप करण्यात आला असून, स्तंभ क्र. ०४ मध्ये नमूद केलेल्या पदावर तात्पुरत्या स्वरुपाची नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ.क्र | परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचे नाव | वाटप करण्यात आलेला विभाग | तात्पुरत्या स्वरुपातील नियुक्ती दिलेले ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ०१ | श्री. अमोल गणपत भोसले | पुणे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, उत्तर सोलापूर, जि. सोलापूर | रिक्त पदी |
| ०२ | श्री. महेश नेमचंद सिंघल | पुणे | उप अधीक्षक भूमि अभिलेख, अक्कलकोट, जि. सोलापूर | रिक्त पदी |
| ०३ | श्रीमती प्रियदा नामदेव साकोरे | कोकण-१ | उप अधीक्षक भूमि अभिलेख, सावंतवाडी, जि. सिंधदुर्ग | रिक्त पदी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ०४ | श्री. समीर दिलीप दाणेकर | औरंगाबाद | उप अधीक्षक भूमि अभिलेख, जालना, जि. जालना | रिक्त पदी |
| ०५ | श्री. किशोर श्रीराम बहिराम | अमरावती | उप अधीक्षक भूमि अभिलेख, राळेगाव, जि. यवतमाळ | रिक्त पदी |
| ०६ | श्री. प्रशांत रमेश हांडे | नागपूर | उप अधीक्षक भूमि अभिलेख, गोंडपिंपरी, जि. चंद्रपूर | रिक्त पदी |
| ०७ | श्री. दुष्यंत विश्वास कोळी | औरंगाबाद | उप अधीक्षक भूमि अभिलेख, औरंगाबाद, जि. औरंगाबाद | रिक्त पदी |
| ०८ | श्री. संजय शंकरराव पवार | अमरावती | उप अधीक्षक भूमि अभिलेख, मारेगाव, जि. यवतमाळ | रिक्त पदी |

२. वरील परिवीक्षाधीन उप अधीक्षक भूमी अभिलेख गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियमीत पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. विहीत कालावधीत (पदग्रहण अवधी वगळता) पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यास टाळाटाळ केल्यास अथवा रजेवर गेल्यास अथवा नियुक्तीत बदल करुन घेण्यासाठी अशासकीय व्यक्तींमार्फत शासनावर दबाव आणल्यास त्यांच्याविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

३. परिविक्षाधीन उप अधिक्षक भूमि अभिलेख म्हणून शासकीय सेवेत रुजू झाल्यानंतर ज्या उमेदवारांना या शासकीय सेवेतून राजीनामा द्यावयाचा असेल, त्यांनी एक महिन्याची पूर्वसूचना (नोटीस) देणे आवश्यक राहील अथवा एक महिन्याचे वेतन शासनाकडे जमा करणे आवश्यक राहील.

४. या शासन निर्णयाव्दारे नियुक्त होणाऱ्या उमेदवारांची नियुक्ती ज्या विभागात करण्यात आली आहे तो विभाग बदलून मिळणार नाही, याची संबंधितांनी नोंद घ्यावी. सदर उमेदवारांना नियुक्तीसाठी महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५ लागू राहील.

५. या शासन निर्णयाव्दारे नियुक्त होणाऱ्या उमेदवारांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ अन्वये तयार करण्यात आलेली परिभाषिक अंशदान निवृत्ती वेतन योजना लागु राहील.

६. वर नमूद केलेल्या अटी व शर्तीव्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिकाऱ्यांना लागू असलेले सर्व नागरी सेवाविषयक सर्वसाधारण नियम त्यांना लागू राहतील.

७. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३ (CPTP-३) मधील परिविक्षाधीन उप अधीक्षक भूमी अभिलेख गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५ मधील तरतूदींनुसार महसूली विभाग वाटप करुन, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या विभागातील रिक्त पदांवर नियुक्ती देण्यात येत आहे. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर अधिकाऱ्यांना नियुक्ती देण्याची पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१८०९१११७२८३५०६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2018.09.11 17:32:55 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) उपसंचालक भूमि अभिलेख, पुणे/मुंबई/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
३) महालेखापाल- (१/२) (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
५) सर्व संबंधीत परिविक्षाधीन अधिकारी (द्वारा :- जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.)
६) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) निवडनस्ती कार्यासन ई-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.